इंडिया वॉटर वीक (भारत जल सप्ताह) समवेत “हमारा जल हमारा जीवन” अभियान राबविण्यासाठी जिल्हास्तरीय समितीची स्थापना करणे.

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सीडीए १०१५/(०१/१५)/लाक्षेवि(कामे)(२)

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: ०५ जानेवारी , २०१५.

**वाचा :**

जलसंसाधन, नदी विकास आणि गंगा संरक्षण, मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे क्र. ७/२/४/TS/CGWBCR, दि. ३१.१२.२०१४ चे पत्र.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या जलसंसाधन मंत्रालयामार्फत दरवर्षी “भारत जल सप्ताह” हा कार्यक्रम नवी दिल्ली येथे आयोजित करण्यात येतो. त्यानुषंगाने “शाश्वत विकासासाठी पाणी व्यवस्थापन” या मध्यवर्ती संकल्पनेस अनुसरुन “हमारा जल हमारा जीवन” हे अभियान दि. १३.०१.२०१५ ते दि. १७.०१.२०१५ च्या दरम्यान राबवावयाचे आहे. या अभियानातंर्गत प्रत्येक जिल्हयातील पाण्याचे दुर्भिक्ष असलेल्या एका गावाची निवड करुन त्या गावामध्ये पाण्याच्या सर्व गरजा भागविण्यासाठी नियोजन व अंमलबजावणी करणे अभिप्रेत आहे.

सदर अभियान यशस्वीपणे राबविण्यासाठी जिल्हास्तरीय समिती स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र राज्यातील सर्व जिल्हयात “हमारा जल हमारा जीवन” हे अभियान यशस्वीपणे राबविण्यासाठी खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २ | जिल्हा कृषी अधीक्षक | सदस्य |
| ३ | कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण | सदस्य |
| ४ | कार्यकारी अभियंता, पाणी पुरवठा, जिल्हा परीषद | सदस्य |
| ५ | जिल्हा शिक्षण अधिकारी | सदस्य |
| ६ | वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा | सदस्य |
| ७ | संबंधित स्वयंसेवी संस्था / तज्ञ व्यक्ती | सदस्य |
| ८ | कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग, (लपा) | सदस्य-सचिव |

सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहिल.

१. "हमारा जल हमारा जीवन" या कार्यशाळेचे नियोजन व अंमलबजावणी करणे.
२. या कार्यशाळेचे आयोजन करण्यासाठी योग्य त्या गावाची / ठिकाणाची निवड करणे.
३. या कार्यक्रमासाठी सहभागी होऊ शकणाऱ्या व्यक्ती / संस्थाची निवड करणे व निमंत्रण देणे.
४. कार्यक्रमातील व्याख्याने देण्यासाठी योग्य व्याख्यात्यांची निवड करणे
५. कार्यशाळेतील चर्चेअंती या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी शिफारशी करणे.
६. कार्यशाळेतील चर्चेतून पाण्याचे दुर्भिक्ष असलेल्या प्रत्येक जिल्हयातील एका गावाची निवड करणे.
७. शाश्वत विकासासाठी पाण्याचे व्यवस्थापन व संवर्धन या विषयाशी निगडीत साहीत्याचे वाटप करणे व या विषयाची जनजागृती निर्माण करणे.
८. जिल्हा स्तरावर खर्च करणे व त्याची प्रतिपूर्ती करण्याबाबती कार्यवाही करताना उद्भवणाऱ्या अडचणींच्या निराकरणासाठी उपाययोजना सुचविणे.
९. या कार्यक्रमासाठी होणाऱ्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करणे.
१०. या कार्यक्रमाचा सविस्तर अहवाल देणे १) फोटोग्राफ २) व्हीडीओग्राफी ३) कार्यशाळेत सहभागी झालेल्याची पुरुष व महीला यांची संघटनानिहाय यादी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०५१४४१०९०६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samadhan Kondiba Sabbinwar

Digitally signed by Samadhan Kondiba Sabbinwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Superintendent Engineer And Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samadhan Kondiba Sabbinwar
Date: 2015.01.05 15:45:15 +05'30'

**(स. कों. सब्बीनवार)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सर्व विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य, विधानभवन, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२

६. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव मंत्रालय, मुंबई ३२
७. सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
८. महासंचालक, वाल्मी औरंगाबाद
९. महासंचालक, मेरी, नाशिक
१०.आयुक्त, कृषी संचालनालय, पुणे.
११.सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.मुख्य अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी (मेटा) नाशिक
१३.मुख्य अभियंता, केंद्रीय जल आयोग, भारत सरकार, नागपूर.
१४.मुख्य अभियंता, राष्ट्रीय जल प्रबोधिनी, भारत सरकार, पुणे.
१५.सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१६.संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
१७.विभागीय संचालक, सेंट्रल ग्राउंड वॉटर बोर्ड, भारत सरकार, नागपूर
१८. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१९.सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग,
२०.निवड नस्ती / लाक्षेवि (कामे) संग्रहार्थ